**बंद करण्यात आलेले वारणा डावा तीर कालवा उपविभाग क्र.३, कोकरुड हे उपविभागीय कार्यालय बंद मधून वगळून पुर्ववत सुरु करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१६/प्र. क्र.२१८/२०१६/आ.(प्रशि)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १२ एप्रिल, २०१७.

<u>वाचा</u> :
१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि. ८/३/१९८४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.
३) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: सीओई/२०१३/(२३/२०१३)/ज.वि., दि.६/२/२००३.
४) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: वारणा सुप्रमा ०१११/प्र.क्र.७६/११/मोप्र-१, दि.१३/१०/२०१६
५) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: आढावा २०१६/प्र.क्र.२१८/२०१६/आ(प्रशि), दि.८/११/२०१६

**<u>प्रस्तावना</u> –**

महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांच्या प्रस्तावानुसार कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर अधिनस्त उपविभागांतर्गतची शिल्लक कामे विभागांतर्गतच्या अन्य उपविभागांतर्गत संलग्न करुन उपविभागीय कार्यालये बंद करण्यास अ.क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार वारणा कालवे विभाग क्र.१, इस्लामपूर अंतर्गतचा वारणा डावा तीर कालवा उपविभाग क्र.३, कोकरुड हा उपविभाग बंद करण्यात आला आहे.

महामंडळ कार्यालयाने सादर केलेल्या अहवालानुसार, वारणा कालवे विभाग क्र.१, इस्लामपूर या विभागांतर्गत वारणा मोठा प्रकल्पाचे मुख्य धरणाचे काम पूर्ण झाले असून वारणा डावा कालवा १ ते ७० कि.मी. व वारणा उजवा कालवा १ ते ११७ कि.मी. मधील कालव्याची कामे, सुधारित प्रशासकीय मान्यता व निधी अभावी बंद होती. तथापि, विभागाकडे वारणा मोठा प्रकल्प व वाकुर्डे उपसा सिंचन योजना अशी दोन स्वतंत्र प्रकल्पांची कामे असुन शासन निर्णय दिनांक १३/१०/२०१६ अन्वये वारणा प्रकल्पाच्या तृतीय सुप्रमा अहवालास (रु.११७४.९८ कोटी इतक्या किमतीस) प्रकल्पाची उर्वरित कामे जून २०१९ पर्यंत पूर्ण करण्याच्या अटीवर सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर कामे ही गुणवत्तापुर्ण व मर्यादित कालावधीत पूर्ण करण्याच्या दृष्टीने विभागास कमीत कमी ५ उपविभागांची आवश्यकता आहे. वारणा प्रकल्पाचे काम जून २०१९ अखेर पूर्ण करण्याचे नियोजन असल्याने व वाकुर्डे उपसा सिंचन योजना टप्पा क्र.२ व ३ मधील कामे सलगतेने पूर्ण करण्यासाठी वारणा कालवे विभाग क्र.१, इस्लामपूर या विभागाकडे ५ उपविभागीय कार्यालये कार्यरत ठेवणे अनिवार्य आहे.

याकरिता वारणा कालवे विभाग क्र.१, इस्लामपूर या विभागांतर्गत (१) वारणा डावा तीर कालवा उपविभाग क्र.१, कोकरुड, (२) वारणा डावा तीर कालवा उपविभाग क्र.२ सागांव, (३) वारणा डावा तीर कालवा उपविभाग क्र.४, शिराळा (मु.पेठ वसाहत), (४) वारणा प्रकल्प उपविभाग क्र.३, वारणावती हे ४ उपविभाग कार्यरत असून अ.क्र.४ येथील शासन निर्णयान्वये बंद करण्यात आलेला

वारणा डावा तीर कालवा उपविभाग क्र.३, कोकरुड हा उपविभाग पुर्ववत सुरु करण्याच्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, (जसं), जलसंपदा विभाग, पुणे अंतर्गतचा कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर अधिनस्त वारणा कालवे विभाग क्र.१, इस्लामपूर अंतर्गतचा अ.क्र.४ येथील शासन निर्णयान्वये बंद करण्यात आलेला वारणा डावा तीर कालवा उपविभाग क्र.३, कोकरुड हे उपविभागीय कार्यालय खालील अटींच्या अधीन राहुन पुर्ववत सुरु करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) वारणा डावा तीर कालवा उपविभाग क्र.३, कोकरुड हे उपविभागीय कार्यालय कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर अंतर्गतच्या वारणा कालवे विभाग क्र.१, इस्लामपूर अंतर्गत कार्यान्वित करण्यात यावे.

२) उपविभागीय कार्यालय महामंडळ कार्यालयाने नेमून दिलेल्या कार्यभारासह व उपविभागास मंजूर असलेल्या पदांसह कोकरुड या मुख्यालयाच्या ठिकाणी कार्यरत राहील.

३) बंद करण्यात आलेले उपविभागीय कार्यालय शासकीय जागेतच कार्यान्वित करण्यात यावे, त्यासाठी बांधकामाचा वेगळ्याने खर्च करु नये. तसेच उपविभागातील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा.

४) प्रशासकीय व आस्थापना खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

२. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: ईआरडब्ल्यू -१०८३/ सीआर-६११/८३/ एडीएम-९, दिनांक ८ मार्च, १९८४ मधील तरतूदीनुसार, “कार्यकारी अभियंता, वारणा कालवे विभाग क्र.१, इस्लामपूर” यांना आहरण व संवितरण अधिकारी व “अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर” हे नियंत्रण अधिकारी म्हणून याव्दारे घोषित करण्यात येत आहे.

३. या प्रकरणी होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष “४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुक ०४ - योजनेतर वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान (०४) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान ४७०१ आय १६२” या प्रधान शीर्षाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वारणा डावा तीर कालवा उपविभाग क्र.३, कोकरुड हे उपविभागीय कार्यालय मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे या प्रादेशिक विभागांतर्गत कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर अंतर्गतच्या वारणा कालवे विभाग क्र.१, इस्लामपूर अंतर्गत दिनांक १७/०४/२०१७ पासून कार्यान्वित होतील या दृष्टीने कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही करावी.

सदर उपविभागांतर्गत कार्यभार सोपविण्याबाबतचे सविस्तर आदेश मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे व अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर यांनी स्वतंत्रपणे निर्गमित करावेत.

५. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/ सीआर/ ८०६/ व्यय-६, दिनांक १५-१०-१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांचे सहमतीने हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०४१२१६०४०४६२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.04.12 16:06:03 +05'30'

**( वि. का. चौधरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४) मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६) मा.विधानसभा/ विधान परिषद सदस्य (सर्व).
७) प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
११) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
१२) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक.
१४) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१५) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे.
१७) सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१८) आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर.
२०) कार्यकारी अभियंता, वारणा कालवे विभाग क्र.१, इस्लामपूर.
२१) अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई (कार्यालयाच्या बदलाची आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
२२) उप अभियंता, वारणा डावा तीर कालवा उपविभाग क्र.३, कोकरुड
२३) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४) आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.